आदिवासी व नक्षलग्रस्त क्षेत्रामध्ये कार्यरत असणाऱ्या राज्य शासकीय कर्मचाऱ्यांना अनुज्ञेय असलेल्या विविध सवलतींचे पुनर्विलोकन करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एसआरव्ही २००९/प्र.क्र.१६७/कार्यासन १२**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२
तारीख: २४ जानेवरी, २०१७

वाचा :-

**१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: टिआरएफ-२०००/प्र.क्र.३/बारा दिनांक ६ ऑगस्ट, २००२.**

**प्रस्तावना :-**

राज्यातील आदिवासी व नक्षलग्रस्त भागातील प्रशासन हे अशा क्षेत्रातील जनतेच्या समस्यांसंदर्भात जागरुक व संवेदनशील राहून अधिक कार्यक्षमतेने कार्यरत राहण्यासाठी प्रोत्साहन म्हणून सदंर्भाधीन शासन निर्णयान्वये अशा क्षेत्रातील कर्मचाऱ्यांसाठी विविध आर्थिक लाभाच्या व बिगर आर्थिक लाभाच्या सवलती लागू करण्यात आल्या आहेत. संदर्भाधीन शासन निर्णयान्वये अनुज्ञेय केलेल्या विविध सवलतींचा लाभ प्रत्यक्ष कार्यक्षमतेच्या वाढीस उपयुक्त ठरतो किंवा कसे? तसेच कालपरत्वे या सवलतींमध्ये सुधारणा करणे आवश्यक आहे काय? व अशा दुर्गम व संवेदनशील भागांमध्ये कार्यक्षमपणे सेवा देण्यासाठी शासकीय कर्मचाऱ्यांना प्रोत्साहन देण्यासाठी म्हणून पध्दतशीरपणे आर्थिक भार असलेल्या व आर्थिक भार नसलेल्या सवलती नव्याने लागू करता येतील काय याबाबत प्रचलित धोरणाचा सर्वंकष आढावा घेण्याची आवश्यकता निर्माण झाली आहे.

## शासन निर्णय :-

वरील वस्तुस्थिती विचारात घेऊन आदिवासी व नक्षलग्रस्त क्षेत्रात नियुक्त झालेल्या अथवा बदलीने पदस्थापना करण्यात आलेल्या कर्मचाऱ्यांना प्रोत्साहन देण्यासाठी लागू असलेल्या प्रचलित सवलती व सुविधांचा अभ्यास करुन त्यामध्ये कालानुरूप बदल करुन, बदलेल्या परिस्थितीत अनुज्ञेय करावयाच्या आर्थिक व बिगर आर्थिक सवलतींचा अभ्यास करुन शासनास शिफारस करण्याकरीता पुढीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे पदनाम | पद |
|---|---|---|
| १ | विभागीय आयुक्त, नागपूर विभाग | अध्यक्ष |
| २ | विभागीय आयुक्त, नाशिक विभाग | सदस्य |
| ३ | विभागीय आयुक्त, कोकण विभाग | सदस्य |
| ४ | विभागीय आयुक्त, अमरावती विभाग | सदस्य |
| ५ | अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर | सदस्य |
| ६ | विशेष पोलीस महानिरीक्षक (नक्षल विरोधी पथक), नागपूर | सदस्य |
| ७ | सहसंचालक (कोषागार), नागपूर विभाग, नागपूर | सदस्य |
| ८ | उपायुक्त (महसूल), विभागीय आयुक्त कार्यालय, नागपूर | सदस्य-सचिव |

२. उपरोक्त समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील. या कार्यकक्षेच्या अनुषंगाने समितीने अभ्यास करुन त्यांचा अहवाल शासनास सादर करावा :-

अ. शासन निर्णय, दिनांक ०६ ऑगस्ट, २००२ अन्वये नक्षलग्रस्त व आदिवासी क्षेत्रातील अधिकारी/कर्मचाऱ्यांसाठी लागू करण्यात आलेल्या सवलतीचे विवेचन व त्यामध्ये कालानुरूप बदल हवे असल्यास त्याविषयी ठोस सूचना करणे.

ब. असल्यास या क्षेत्रात कायमपणे नियुक्त झालेल्या किंवा बदलीने ठराविक कालावधीसाठी पदस्थापित होणाऱ्या अधिकारी व कर्मचाऱ्यांना प्रोत्साहन देण्याकरीता कोणत्या सवलती देणे आवश्यक आहे.

क. अशा सवलतीचा लाभ केवळ विशिष्ट/ठराविक संवर्गातील व विशिष्ट क्षेत्रामध्येच कायमपणे नियुक्त झालेल्या किंवा बदलीने ठराविक कालावधीसाठी पदस्थापित होणाऱ्या कर्मचाऱ्यांना देणे आवश्यक आहे काय? आवश्यक असल्यास अशा संवर्गांचा संवर्गनिहाय व ज्या क्षेत्रासाठीच असा लाभ देणे आवश्यक आहे अशा विशिष्ट क्षेत्राचा तपशिल.

ड. बदली व पदस्थापना विषयक बाबींचा अंतर्भाव बदली अधिनियमामध्ये करून घेणे आवश्यक आहे काय, असल्यास योग्य वाटतील अशा सूचना करणे.

ड. वरील तपशिल विचारात घेवून अशा अधिकारी/कर्मचाऱ्यांना देणे योग्य असलेल्या आर्थिक भार असलेल्या सवलतींचा तसेच आर्थिक भार नसलेल्या सवलतींचा तपशिल व त्या लागू करण्याची पध्दतीविषयक सूचना.

ई. कर्मचाऱ्यांना आर्थिक भार असलेल्या सवलती अनुज्ञेय केल्यास त्याकरिता अपेक्षित असलेल्या आर्थिक भाराचा अंदाजित तपशिल.

३. उपरोक्त कार्यकक्षेच्या अनुषंगाने वरील समितीने त्यांचा अहवाल ३ महिन्यांच्या कालावधीत शासनास सादर करावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१२४१७०३०२५७०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Subhash Hanmant Umaranikar

Digitally signed by Subhash Hanmant Umaranikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d5ea2bb9565eeb9b02d583f130371941a03fc5d98df65d3daafe66960a165024, serialNumber=596a24adfcfcd3edb4245812c0eaccecdf4de3ec6a308b42a682a980bca4db38, cn=Subhash Hanmant Umaranikar
Date: 2017.01.24 17:04:48 +05'30'

**(सु. ह. उमराणीकर)**
**उपसचिव (सेवा), महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुंबई
३. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
४. विभागीय आयुक्त, नागपूर विभाग
५. विभागीय आयुक्त, नाशिक विभाग
६. विभागीय आयुक्त, कोकण विभाग
७. विभागीय आयुक्त, अमरावती विभाग
८. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर
९. विशेष पोलीस महानिरीक्षक (नक्षल विरोधी पथक), नागपूर
१०. संचालक (कोषागार), नागपूर विभाग, नागपूर
११. उपायुक्त (महसूल), विभागीय आयुक्त कार्यालय, नागपूर
१२. सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव/ सचिव
१३. निवड नस्ती, कार्यासन १२